**शेतकरी जनता अपघात विमा योजनेंतर्गत दि.०१.११.२०१५ ते ३०.११.२०१५ या खंडीत कालावधीतील अंतीम पात्र ठरलेले ९ विमा प्रस्ताव निकाली काढणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : शेअवि-२०१८/प्र.क्र.१८६/११-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक - ०१ जानेवारी, २०१९

**वाचा :-** १) कृषि व पदूम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०१४/प्र.क्र.६९/११-अे, दि.३०.१०.२०१४
२) कृषि व पदूम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०१५/प्र.क्र.१५९/११-अे, दि.१३.१०.२०१६
३) कृषि व पदूम विभाग, शासन निर्णय क्र. शेअवि-२०१५/प्र.क्र.१५९/११-अे, दि.२६.११.२०१५
४) कृषि व पदूम विभाग, शासन निर्णय क्र.शेअवि-२०१४/प्र.क्र.६९/११-अे, दि.१७.०३.२०१७
५) कृषि व पदूम विभाग, शासन निर्णय क्र.शेअवि-२०१४/प्र.क्र.६९/११-अे, दि.२२.०३.२०१७
६) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. शेअवि-२०१५/प्र.क्र.९/सां.९/३१४/२०१८, दि.२३.०८.२०१८
७) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग,क्र.शेअवि- २०१८/ प्र.क्र.१९३/११-अे, दि. ०१.१२.२०१८

**प्रस्तावना :-**

शेतकरी जनता अपघात विमा योजनेंतर्गत दि.०१.११.२०१५ ते ३०.११.२०१५ या वाढीव कालावधीत काम करण्यास लिबर्टी व्हिडियोकॉन जनरल इंशुरन्स कंपनी लि. या विमा कंपनीने नकार दिल्याने सदर कालावधी हा खंडीत कालावधी घोषित करुन, कोकण, नाशिक व पुणे महसूल विभागातील पात्र मृत व अपघातग्रस्त शेतकऱ्यांना विमा रकमेचा लाभ देण्याबाबत कृषि आयुक्तालयाने प्रस्तावित केल्यानुसार दि.१३.१०.२०१६ व दि.२५.११.२०१६ च्या शासन निर्णयांन्वये खंडीत कालावधीतील विमा दावे शासन स्तरावरुन विशेष बाब म्हणून मंजूर करण्यास शासनाने मान्यता दिलेली होती. त्यानुसार दि.०१.११.२०१५ ते ३०.११.२०१५ या खंडीत कालावधीत एकुण १२९ प्रस्ताव प्राप्त झालेले होते. खंडीत कालावधीतील विमा प्रस्तावांचे मंजुरीसाठी शेतकरी जनता अपघात विमा योजनेच्या अटी व शर्तीनुसार कागदपत्रांची पूर्तता असलेले १०६ विमा प्रस्ताव मंजुरीसाठी पात्र ठरविण्यात आले होते. त्यासाठी पात्र शेतकऱ्यांना द्यावयाची रु.१०४.५० लाख व विमा सल्लागार कंपनीस ब्रोकरेज म्हणून द्यावयाची रु.१.६० लाख इतकी रक्कम अशी एकुण रु.१०६.१० लाख इतकी रक्कम अनुक्रमे दि.१७.०३.२०१७ व दि.२२.०३.२०१७ रोजीच्या शासन निर्णयांन्वये यापूर्वीच वितरीत करण्यात आलेली आहे. तसेच उपरोक्त १२९ प्रस्तावांपैकी ९ प्रस्ताव अपात्र असून, ५ प्रस्तावांतील त्रुटींची पूर्तता वारंवार पाठपुरावा करुनही न झाल्याने त्यांना अपात्र ठरविण्यात आलेले असून, त्याबाबत संबंधितांना कळविण्यात आलेले आहे.

आता एकुण प्राप्त १२९ प्रस्तावांपैकी १०६ प्रस्तावांबाबत यापुर्वीच कार्यवाही झालेली आहे व १४ प्रस्ताव अपात्र ठरल्याने, उर्वरीत ९ प्रस्तावांची कागदपत्रांतील त्रुटींची पूर्तता आता झालेली असल्याने त्या ९ प्रस्तावांना कृषि आयुक्तालय स्तरावरील, शासनास शिफारस करण्यासाठी गठित करण्यात आलेल्या समितीने अंतीम मंजुरी दिलेली आहे व पात्र ठरलेले ९ विमा प्रस्ताव निकाली काढण्यासाठी रु.८.५० लाख

इतके अनुदान वितरीत करण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने केलेली आहे. त्यानुषंगाने शेतकरी जनता अपघात विमा योजनेंतर्गत दि.०१.११.२०१५ ते ३०.११.२०१५ या खंडीत कालावधीतील अंतीम ९ पात्र विमा प्रस्तावांपैकी ८ शेतकरी विविध कारणांस्तव मृत्युमुखी पडलेले असून त्यांना योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनुसार प्रत्येकी रु. १.०० लाख तसेच एका शेतकऱ्यास अपंगत्व आलेले असल्याने त्याला रु. ५० हजार असे एकुण रु. ८.५० लाख इतके अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

शेतकरी जनता अपघात विमा योजनेंतर्गत दि.०१.११.२०१५ ते ३०.११.२०१५ या खंडीत कालावधीतील अंतीम पात्र ठरलेल्या ९ विमा प्रस्तावांना मान्यता देवून त्यांचे विमा दावे निकाली काढण्यासाठी रु.८.५० लाख इतकी रक्कम सन २०१८-१९ या वर्षासाठी गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजनेसाठी अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या रकमेतून वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा -

**मागणी क्र. डी - ३**
**२४०१ पीक संवर्धन**
**(००) (०६) गोपीनाथ मुंडे शेतकरी अपघात विमा योजना (कार्यक्रम)**
**(२४०१ ४४२७) राज्य योजना - ३३ अर्थसहाय्य**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- ५ यांना आहरण व संवितरण अधिकारी तर कृषि संचालक, (विस्तार व प्रशिक्षण) यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाने त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे अनौसंकृ १६८/१४३१, दि.२९.०९.२०१८ व अनौ.संदर्भ क्र.२९२/२०१८/व्यय १, दि.१७.१२.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेताक २०१९०१०११५२८२५१६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Dr.Kiran Patil
Date: 2019.01.01 15:37:23
+05'30'

**( किरण पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव

२. मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
४. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
५. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
६. मा.राज्यमंत्री (फलोत्पादन) यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
७. सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ विशेष कार्य अधिकारी
८. सर्व मा.विधानसभा सदस्य
९. सर्व मा. विधानपरिषद सदस्य
१०.मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,मंत्रालय,मुंबई ३२
११.सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१२.सर्व विभागीय महसूल आयुक्त (कोकण, नाशिक, पुणे, औरंगाबाद, अमरावती, नागपूर)
१३.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४.सर्व जिल्हाधिकारी
१५.उप सचिव, (११-अे व २-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
१६.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१८.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१९.सर्व जिल्हा परिषदांचे, जिल्हा कृषि विकास अधिकारी
२०.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा), मुंबई.
२१.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२२.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखापरिक्षा), नागपूर
२३.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता),नागपूर
२४.संचालक, लेखावकोषागारे, मुंबई
२५.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२६.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२७.मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२८.सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२९.सर्व तहसिलदार
३०.सर्व उप विभागीय कृषि अधिकारी
३१.सर्व तालुका कृषि अधिकारी
३२.निवडनस्ती, कार्यासन ११-अे.